**आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या थकबाकीचा दुसरा हप्ता अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०१८/प्र.क्र.१४५/का-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : २६ ऑगस्ट, २०२०.

वाचा :-
१) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.१/सेवा-९, दि.३०.०१.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि.२०.०२.२०१९.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.अआशा-२०१८/प्र.क्र.१४५/का-११, दि.१८.०९.२०१९.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि. २३.०६.२०२०.
५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.वेतन-२०१९/१०५/टिएनटी-३, दि.२८.०७.२०२०.

प्रस्तावना :

सातव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशींवरील केंद्र शासनाचे निर्णय विचारात घेऊन राज्य शासकीय कर्मचारी व इतर पात्र कर्मचारी यांना सुधारित वेतनश्रेणी लागू करण्याची शिफारस करण्याकरिता श्री.के.पी.बक्षी, सेवानिवृत्त अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीच्या शिफारशी काही फेरफारासह स्वीकृत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्या अनुषंगाने इतर राज्य शासकीय कर्मचाऱ्यांबरोबर शासकीय शाळांतील पूर्णवेळ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २०१८ संदर्भ क्र.१ अन्वये अधिसूचित केले आहेत. तसेच संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकानुसार प्रारंभिक वेतननिश्चितीबाबत व थकबाकी अदा करण्यासंदर्भात सविस्तर कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर कर्मचाऱ्यांना दिनांक १ जानेवारी, २०१६ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ या कालावधीमधील अनुज्ञेय थकबाकी सन २०१९-२० या आर्थिक वर्षापासून पुढील ५ वर्षात ५ समान हप्त्यात प्रदान करण्याबाबत निर्देश दिलेले आहेत.

२. तथापि, राज्यात कोविड-१९ विषाणूच्या साथीमुळे उद्भवलेली समस्या व त्यामुळे राज्याच्या महसूली जमेवर झालेला प्रतिकूल परिणाम विचारात घेऊन राज्य शासकीय कर्मचारी व इतर पात्र कर्मचारी आणि सर्व प्रकारच्या निवृत्तीवेतन धारकांना दिनांक १ जुलै, २०२० रोजी देय असलेल्या हप्त्याचे प्रदान १ वर्ष पुढे ढकलण्याचा निर्णय वित्त विभागाच्या दिनांक २३.०६.२०२० च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. या पार्श्वभूमीवर राज्यातील खाजगी अनुदानित शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना दिनांक १ जुलै, २०२० रोजी देय असलेला दुसऱ्या हप्त्याचे प्रदान पुढे ढकलण्याबाबतचा

निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने दिनांक २८ जुलै, २०२० च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्याच धर्तीवर आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगाच्या थकबाकीचा दिनांक १ जुलै, २०२० रोजी देय असलेला दुसऱ्या हप्त्याचे प्रदान पुढे ढकलण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक १ जुलै, २०२० रोजी देय असलेला सातव्या वेतना आयोगाच्या दुसऱ्या हप्त्याचे प्रदान १ वर्ष पुढे ढकलण्यात येत आहे. सदर हप्ता प्रदान करण्यासंदर्भात स्वतंत्रपणे आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकतांक २०२००८२६१५१०४९३८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, serialNumber=e714bbcd4d43c6782884c7e7a2091f9f1edc1d97ebb542c48b98fb8c8bdd6cf4, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2020.08.26 15:17:20 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष / उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव
२. मा.सभापती / उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
३. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मा.विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
८. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मा.प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२,, मुंबई/नागपूर.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,, मुंबई/नागपूर.
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१९. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ठाणे/नागपूर/अमरावती.
२०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२१. अवर सचिव (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवड नस्ती (का.११).